**महाबळेश्वर तालुक्यातील तळदेव व तापोळा ह्या दोन प्राथमिक आरोग्य केंद्रांच्या कार्यक्षेत्रातील १४ उपकेंद्रांकरीता पुर्वलक्षी प्रभावाने बेल-एअर रुग्णालयास सन २०१८-१९ या वर्षीचे अनुदान मंजुर करणे**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्राआकें-२०१९/ प्र.क्र.१९४/ आरोग्य-४

मंत्रालय, १० वा मजला, संकुल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख: २४ जून, २०२०.

वाचा :-

**१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०१५/प्र.क्र.१२९/आरोग्य-४, दि.२७.०३.२०१८.**
**२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.विआकें-२०१९/प्र.क्र.१९४/आरोग्य-४, दि.०१.०१.२०२०**
**३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.विआकें-२०१९/प्र.क्र.१९४/आरोग्य-४, दि.११.०६.२०२०.**
**क्र.सहसंचालक, आरोग्य सेवा (प्राआकेंद्र/उपकेंद्र/दवाखाने), मुंबई यांचे पत्र, क्रमांकः संआसे /कक्ष-७अ/ टे-७/तळदेव व तापोळा अंतर्गत उपकेंद्र अनु.मागणी/१००८/२०२०, दि.२८.०२.२०२०.**

प्रस्तावना:-

सातारा जिल्ह्यातील महाबळेश्वर तालुक्यातील तळदेव व तापोळा येथील दोन प्राथमिक आरोग्य केंद्रे संदर्भाधिन अनुक्रमांक १ येथील शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-ब मधील अटी व शर्तीच्या अधीन राहून, इंडियन रेड क्रॉस सोसायटी संचलीत पांचगणी (महाबळेश्वर), जि.सातारा येथील बेल-एअर रुग्णालय या संस्थेस, पब्लिक, प्रायव्हेट पार्टनशिप तत्वावर १ वर्षाच्या कालावधीकरीता प्रायोगिक तत्वावर चालविण्यास देण्यास शासन मान्यता देण्यात आली होती. तळदेव व तापोळा येथील २ प्राथमिक आरोग्य केंद्राअंतर्गत येणाऱ्या १४ उपकेंद्रांना सदर २ प्राथमिक आरोग्य केंद्राबरोबरच हस्तांतरीत करण्यास संदर्भाधिन अनुक्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये पुर्व लक्षी प्रभावाने मान्यता देण्यात आली आहे.सहसंचालक, आरोग्य सेवा (प्राआकेंद्र/उपकेंद्र/दवाखाने), मुंबई यांच्या यांच्या शिफारसीस अनुसरुन तळदेव व तापोळा या दोन प्राथमिक आरोग्य केंद्राअंतर्गत येणाऱ्या १४ उपकेंद्राकरीता सन २०१८-१९ यावर्षाकरीता अनुदान मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यासंदर्भात पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय</u>**:-

प्राथमिक आरोग्य केंद्र तळदेव अंतर्गत सहा उपकेंद्रे याकरीता रु.२३,२२,७६६/- व प्राथमिक आरोग्य केंद्र तापोळा अंतर्गत आठ उपकेंदे याकरीता रु.३०,०८,१३७/- अनुदान दि.०७.०७.२०१८ ते दि.३१.०३.२०१९ या कालावधीसाठी अनुदान मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम इंडियन रेड क्रॉस सोसायटी संचलीत पांचगणी (महाबळेश्वर), जि.सातारा येथील बेल-एअर हॉस्पिटल या संस्थेस देण्यासाठी सहसंचालक (स्थानिक स्तर) आरोग्य सेवा आयुक्तालय, पुणे यांनी जिल्हा परिषद, सातारा यांच्याकडे हस्तांतरीत करावा.

सदर खर्च मागणी क्र.आर-१, "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-सार्वजनिक आरोग्य, ००१-संचालन व प्रशासन, (०१) सह संचालक, आरोग्य सेवा पुणे, (०२)(०८) प्राथमिक आरोग्य केंद्रे (स्थानिक क्षेत्र) (अनिवार्य) (२२१० ५०४१), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या खालील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. प्रस्तुत प्रयोजनार्थ झालेला खर्च खालील लेखाशीर्षांतर्गत सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षाकरीता मंजुर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील भाग-पहिला, उपविभाग-एक मधील अनुक्रमांक २७ येथील नियम क्र.१४९ आणि परिशिष्टातील भाग-पहिला, उपविभाग-तीन मधील अनुक्रमांक ४ येथील नियम क्र.२७ (२) अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०१०१८१११९६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip M Balkavde

Digitally signed by Pradip M Balkavde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=8db6aab31faca2f1a89698a28c94703436c07cda664672d20607766dc59d345b, serialNumber=ed0fa40788bb5c0d7f76b869fa2e5835af215c6a80eae8f70eaf87b0cf68d63f, cn=Pradip M Balkavde
Date: 2020.06.24 14:55:36 +05'30'

प्र. मो. बलकवडे

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.

२. संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

३. संचालक, आरोग्य सेवा-२, पुणे.

४. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (कुटूंब कल्याण, माता बालसंगोपन व शालेय आरोग्य), पुणे.

५. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.

६. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ), आरोग्य सेवा, पुणे.

७. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन ), पुणे.

८. उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे.

९. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, सातारा.

१०. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.

११. इंडियन रेड क्रॉस सोसायटी संचलीत पांचगणी ( महाबळेश्वर ), जि.सातारा येथील बेल-एअर हॉस्पिटल.

१२. वित्त विभाग (विनियम कार्यासन ), मंत्रालय, मुंबई.

१३. अवर सचिव (अर्थसंकल्प), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.

१४.निवडनस्ती( आरोग्य-४ ), सा.आ.वि.